ट्रामा केअर युनिट, बडनेरा, जि.अमरावती येथील १३ अस्थाई पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पदआ २०१८ /प्र.क्र. १९३ /आरोग्य-३

१० वा मजला, संकुल इमारत,
गो.ते.रुग्णालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: २२ ऑक्टोबर,२०१८

वाचा -

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक - पदआ २०१८/प्र.क्र.१९३/आरोग्य -३, दिनांक- २२.०६.२०१८

२) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक- संआसे/कक्ष-३/टे-५अ/२०१८-१९/अकोला/अपदे/२९७४-७५/१८, दिनांक-२१.०३.२०१८.

## शासन निर्णय-

उपरोक्त अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला यांच्या अधिपत्याखालील ट्रामा केअर युनिट, बडनेरा, जि.अमरावती येथील १३ अस्थाई पदांना दि.०१.०३.२०१८ ते दि.३०.०९.२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

२. आता या शासन निर्णयान्वये ट्रामा केअर युनिट, बडनेरा, जि.अमरावती येथील सदर १३ अस्थाई पदांना दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१८-२०१९ या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक-आर-१

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१ - नागरी आरोग्य सेवा - विषम चिकित्सा
०१० - मुसफल क्षेत्रातील शासकीय रुग्णालये व दवाखाने
(०१)(०१) - मुसफल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये (२२१० ०१४६)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक,दि.- ०७.०९.२०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१९१७४६५०९४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2018.10.22 13:03:37 +05'30'

**(रो.दि.कदम -पाटील)**
अवरसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई नागपूर
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक,आरोग्य सेवा, मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर) मुंबई.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) मुंबई.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, अमरावती.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
९. वैद्यकीय अधिक्षक, ग्रामिण रुग्णालय, बडनेरा, जि.अमरावती.
१०. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/ सेवा-५/अर्थसंकल्प, सा.आ.वि. मंत्रालय,मुंबई.
१२. निवडनस्ती (आरोग्य-३)

शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक-पदआ २०१८ /प्र.क्र. १९३/आरोग्य-३,
विवरणपत्र.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी व ग्रेड पे (रुपये) | अस्थाई पद संख्या |
|---|---|---|---|
| १ | अस्थिव्यंग शल्यचिकित्सक, वर्ग-२ | १५६००-३९१०० (ग्रेड पे ५४०० ) | १ |
| २ | बधिरीकरण शास्त्रज्ञ, वर्ग-२ | १५६००-३९१०० (ग्रेड पे ५४०० ) | २ |
| ३ | वैद्यकीय अधिकारी, वर्ग-२ | १५६००-३९१०० (ग्रेड पे ५४०० ) | २ |
| ४ | परिसेविका, वर्ग-३ | ९३००-३४८०० (ग्रेड पे ४३०० ) | १ |
| ५ | अधिपरिचारीका, वर्ग-३ | ९३००-३४८०० (ग्रेड पे ४२०० ) | ३ |
| ६ | वाहन चालक, वर्ग-३ | ५२००-२०२०० (ग्रेड पे १९००) | १ |
| ७ | कक्षसेवक, वर्ग-४ | ४४४०-७४०० (ग्रेड पे १३००) | ३ |
| **एकूण** | | | **१३** |